**अलिबाग, जि.रायगड येथे नाट्यगृह बांधकामासाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०१५/प्र.क्र.८५/सां.का.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ मार्च, २०२३

**वाचा :** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.नागृबा-२०१५/ प्र.क्र.८५/सां.का.१, दि.०७.०९.२०१६
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.नागृबा-२०१५/ प्र.क्र.८५/सां.का.१, दि.२३.०५.२०१७
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.नागृबा-२०१५/ प्र.क्र.८५/सां.का.१, दि.१०.०७.२०१७
४) जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग यांचे पत्र क्र. साशा/कार्या-१/ब-४/ पीएनपी नाटयगृह/२०२२, दि.०६.०९.२०२२.

**प्रस्तावना :**

जिल्हा मुख्यालयी नाट्यगृह बांधकाम करण्यासाठी निधी मंजूर करण्याची योजना विभागाच्या दि.२९.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये कार्यरत आहे. या योजनेनुसार पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, अलिबाग या सहकारी संस्थेच्या नाट्यगृह इमारतीचे बांधकामासाठी शासन निर्णय दि.०७.०९.२०१६ अन्वये रु.४,७५,९३,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी पंच्याहत्तर लक्ष त्र्याण्णव हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देऊन शासकीय अर्थसहाय्याचा प्रथम हप्ता म्हणजेच रु.१.५२ कोटी वितरीत करण्यात आला आहे. सदरहू वितरीत रु.१.५२ कोटी व संस्थेच्या हिश्श्याचे रु.९५,९३,०००/- असे एकूण रु.२,४७,९३,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्तेचाळीस लक्ष त्र्याण्णव हजार फक्त) अर्थसहाय्याचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग यांनी सादर केले आहे. उपर्निर्दिष्ट क्र.२ येथील शासन निर्णयान्वये शासकीय अर्थसहाय्याचा दुसरा हप्ता म्हणजेच रु.१.९० कोटी वितरीत करण्यात आला आहे. उपर्निर्दिष्ट क्र.३ येथील शासन निर्णयान्वये शासकीय अर्थसहाय्याचा तिसरा हप्ता म्हणजेच रु.३८,००,०००/- (रुपये अडतीस लक्ष फक्त) वितरीत करण्यात आला आहे. आता जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग यांच्या उपर्निर्दिष्ट दि.०६.०९.२०२२ च्या पत्रानुसार स्थापत्य कामात वाढ झाल्याने, यापूर्वीच्या अंदाजपत्रकाव्यतिरिक्त काही बाबींचा समावेश झाल्याने, प्रत्यक्ष काम करतेवेळी अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर केला असल्याने सार्वजनिक बांधकाम विभागाकडून रु.४,५६,३५,०००/- इतक्या वाढीव प्राप्त रक्कमेच्या अंदाजपत्रकास मंजूरी देण्याची विनंती केली होती. मूळ अंदाजपत्रकात १५% पेक्षा जास्त वाढ होत असल्याने, रु.९,३२,२८,०००/- इतक्या किंमतीच्या अद्ययावत सुधारीत अंदाजपत्रकाचा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने रु.९,३२,२८,०००/- इतक्या रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. सबब, एक विशेष बाब म्हणून पुन:श्च सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, अलिबाग या सहकारी संस्थेमार्फत बांधण्यात आलेल्या नाट्यगृह इमारतीच्या बांधकामासाठी रु.९,३२,२८,०००/- (रुपये नऊ कोटी बत्तीस

लक्ष अठ्ठावीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रक व आराखडयास "विशेष बाब" म्हणून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** सदर प्रकरणी जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग हे नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**३.** यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला संस्कृती (००) १०२-कला व संस्कृती प्रचालन (०१)(०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (कार्यक्रम) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०५ १४८१) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पिय वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**४.** सदर प्रकरणी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र .अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०८ फेब्रुवारी, २०२३ अन्वये विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग यांची राहील.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध झाला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३०९१५१९१४६९२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.09 16:01:54 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) जिल्हाधिकारी, जिल्हा रायगड-अलिबाग
६) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड-अलिबाग
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
९) नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय, मुंबई.
११) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
१२) अध्यक्ष, पी.एन.पी. सहकारी सांस्कृतिक कला विकास मंडळ, प्रभाकर पाटील नगर, प्लॉट नं.१३, आरडीसी बँकेजवळ, अलिबाग-रायगड
१३) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई (अर्थसंकल्प शाखेने सदर रक्कम अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करावी.)
१४) निवड नस्ती (सां.का.१).